आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत बांधील स्वरुपाच्या बाबींकरीता निधी वितरण.
(कार्यक्रम खर्च-मागासवर्गीय कल्याण -लेखाशीर्ष २२२५ ४१२२ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र. ०२ / कार्यासन-६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-**४०० ०३२
**दिनांक :-**०६ **जानेवारी, २०२२.**

**वाचा :-**

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८ /अर्थ-३, २४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे कार्यालयाचे पत्र, क्र.आसंप्रसं-२०२१/लेखा/का-२/५०८,दि.२३.११.२०२१.

**प्रस्तावना : -**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयास अनुसरून अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण ( BEAMS) वितरण प्रणालीवर वेळोवेळी उपलब्ध करुन दिलेल्या मर्यादेत तसेच स्वतंत्र नस्तीवर वित्त विभागाच्या मान्यतेने मागणी क्र.टी-५ मधील अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी (कार्यक्रम खर्च) (२२२५४१२२) अंतर्गत ०१-वेतन, १०-कंत्राटी सेवा व १३-कार्यालयीन खर्च या उद्दीष्टाखालील अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७५ टक्के मर्यादेतील निधी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना वितरीत करण्यात आलेला आहे.

सद्यस्थितीत राज्यात ८ अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्या कार्यरत असून नविन ७ समित्यांचे कामकाज सुरू करण्याबाबतची कार्यवाही सुरू आहे. विभागांतर्गत अनुसूचित जमाती प्रमाणपत्र वैधता तपासणी समितीचे कामकाज नियमितपणे चालू राहणे अत्यंत गरजेचे असून शैक्षणिक वर्षाच्या सुरूवातीला या समित्यांना विशेषत: अतिरिक्त कामकाज/ उद्दीष्ट देण्यात आलेले आहे. याकरीता यापुर्वी वितरीत निधी अपुरा पडत असल्याने सदर योजनेंतर्गत ०१-वेतन, १०-कंत्राटी सेवा व १३-कार्यालयीन खर्च या उद्दीष्टांखाली वाढीव निधी मागणीच्या अनुषंगाने वित्त विभागाने अर्थसंकल्पित तरतूदीच्या ९० टक्के मर्यादेतील निधी वितरीत करण्यास सहमती दर्शविली आहे. सदर मर्यादेतील उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या खालील अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (२२२५ ४१२२) या योजनेंतर्गत वित्त विभागाने सहमती दर्शविल्यानुसार खालील विशिष्ट बाबींकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदीच्या ९० टक्के मर्यादेतील उर्वरीत निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| योजनेचे नांव | उद्दीष्ट क्रमांक | २०२१-२२ साठीची अर्थसंकल्पिय तरतूद | उपलब्ध ९०% तरतुद | यापुर्वी वितरीत ७५ टक्के तरतूद | सदर शा.नि.अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| (०२)(२४) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी(२२२५ ४१२२) | ०१-वेतन | २३५२.५९ | २११७.३३ | १७६४.४४ | ३५२.८९ |
| | १०-कंत्राटी सेवा | ३००.०० | २७०.०० | २२५.०० | ४५.०० |
| | १३-कार्यालयीन खर्च | २९१.०० | २६१.९० | २१८.२५ | ४३.६५ |
| **एकूण** | | **२९४३.५९** | **२६४९.२३** | **२२०७.६९** | **४४१.५४** |

२. उपरोक्तप्रमाणे एकूण **रू.४४१.५४ लाख ( अक्षरी रूपये चार कोटी एक्केचाळीस लाख चौपन्न हजार फक्त)** इतका निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर निधी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांना वितरीत करण्यात यावा. वितरीत निधी खर्च करतांना संबंधितांमार्फत राज्यशासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयामधील तरतुदी व सर्व अटी शर्तीचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत त्यांच्या अनौ.सं.क्र.११४०/व्यय-१४, दि.४.०१.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०६१०५६५९०५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108,
pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613,
serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.01.06 13:41:37 +05'30'

**(रविंद्र दि. औटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.

६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवड नस्ती (का-६).